**मौजे तिर्थपूरी ता. घनसावंगी, जि.जालना येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२२/प्र.क्र.१९४/ आरोग्य-४
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २६ जुलै, २०२३.

**वाचा:-१)सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे.६/ तिर्थपुरी५०खाटानिवाबांधकाम ८७०७-०८ /२२, दि.२०.०६.२०२२ .**

**प्रस्तावना:-**

मौजे तिर्थपूरी ता.घनसावंगी, जि.जालना येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयातील अधिकारी/कर्मचारी निवासस्थान बांधकामाचे रु. २३४५.४९ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्राकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावातील तांत्रीक बाबी तपासून मान्यता देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने छाननीअंती Recapulation Sheet प्रमाणे तरतुदी प्रस्तावित केल्या असून रुग्णालय इमारतीसाठी रु. २०१३.६० लक्ष इतकी रक्कम परिगणित केली होती. तद्नंतर सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत मा. उच्चस्तरीय समिती समोर सादर करण्यात आला असता मा. उच्चस्तरीय समितीने दि. २१.०४.२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मौजे तिर्थपूरी जि.जालना येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाच्या रु. १९.९८ कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास सहमती दर्शविली आहे. यास्तव मौजे तिर्थपूरी जि.जालना येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाच्या रु. १९.९८ कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे तिर्थपूरी ता.घनसावंगी जि.जालना येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाच्या रु. १९.९८ कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.
५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्यानिविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७) प्रस्तावित इमारत उप जिल्हा रुग्णालय पार्कींग फ्लोअर+१,२ व ३,तळमजला + स्टेअरकेस अशी एकूण ४२ निवासस्थाने असून,त्याचे क्षेत्रफळ ४५५६.८४ चौ.मी.असून बांधकामाचा दर २७,०००/चौ.मी.आहे.

८) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग यांच्या अधीन अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्याच्या अटीस अधीन राहून अंदाजित रु. २७.७४ कोटी इतक्या किंमतीस सहती दर्शविण्यात येत आहे.

३. सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१३१८२१२४४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.07.26 17:32:22 +05'30'

**( अशोक मा. आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, जालना.
८. वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय,जालना.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
१०. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.